<u>सन २०१९-२० विशेष केंद्रीय सहाय्याचे निधी वितरणाबाबत.</u>

**१) महात्मा फुले मागासवर्ग विकास महामंडळ मर्या. मुंबई**
**२) संत रोहिदास चर्मोद्योग व चर्मकार विकास महामंडळ मर्या. मुंबई**
**३) महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ, मुंबई**

# महाराष्ट्र शासन

## सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग

**शासन निर्णय क्रमांक : विकेंस-२०१९/प्र.क्र.१४/अर्थसंकल्प (विघयो,)**

मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक:- १८ फेब्रुवारी, २०२०

<u>वाचा</u> :- १) सामाजिक न्याय व अधिकारिता मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र. ११०१४/१९/२०१९-SCD-II दि.२३.१०.२०१९

२) सामाजिक न्याय व अधिकारिता मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र. ११०१४/१९/२०१९-SCD-II दि.३१.१२.२०१९

३) दारिद्र्य रेषेखालील राहणाऱ्या अनुसूचित जातीच्या विकासाबाबत विशेष केंद्रीय सहाय्य योजनेंतर्गत अनुसूचित जाती उपयोजनेच्या अनुषंगाने (Special central assistance to scheduled caste sub plan (SCA to SCSP) - Centrally Sponsored Scheme Development of scheduled castes living below the poverty line) केंद्र शासनाने मे, २०१९ अखेर एकत्रितपणे निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना.

**<u>प्रस्तावना :-</u>**

अनुसूचित जाती उपयोजनेंतर्गत राबविण्यात येणाऱ्या योजनांसाठी पूरक म्हणून केंद्र शासनाकडून प्रतिवर्षी विशेष केंद्रीय सहाय्य उपलब्ध करुन देण्यात येते. हे विशेष केंद्रीय सहाय्य विभागाच्या अधिपत्याखालील ०३ मागासवर्ग विकास महामंडळ, खादी व ग्रामोद्योग मंडळामार्फत राबविण्यात येणाऱ्या विविध योजनांच्या लाभार्थ्यांना वितरीत करण्यात येते.

२. केंद्र शासनाकडून संदर्भाधीन क्र. १ च्या पत्रान्वये सन २०१९-२० साठीचा विशेष केंद्रीय सहाय्य अंतर्गत एकूण रु.६५,०५,८६,०००/- तसेच संदर्भाधीन क्र.२ च्या पत्रान्वये रु.११,४५,००,०००/- असा एकूण रु.७६,५०,८६,०००/- (अक्षरी रुपये श्याहत्तर कोटी पन्नास लाख श्याऐंशी हजार फक्त) इतका निधी वितरीत केला आहे. महात्मा फुले मागासवर्ग विकास महामंडळ व संत रोहिदास चर्मोद्योग व चर्मकार विकास महामंडळ तसेच महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ यांना त्यांच्यामार्फत अनुसूचित जाती व नवबौध्दांसाठी राबविण्यात येणाऱ्या विविध योजनांच्या लाभार्थ्यांना अनुदान स्वरुपात देण्यासाठी व प्रशिक्षण योजना राबविण्यासाठी केलेली मागणी विचारात घेऊन रु.७६,५०,८६,०००/- (अक्षरी रुपये श्याहत्तर कोटी पन्नास लाख श्याऐंशी हजार फक्त) एवढा निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०१९-२० या आर्थिक वर्षासाठी केंद्र शासनाकडून विशेष केंद्रीय सहाय्यांतर्गत रु.७६,५०,८६,०००/- (अक्षरी रुपये श्याहत्तर कोटी पन्नास लाख श्याऐंशी हजार फक्त) इतका निधी प्राप्त

झालेला आहे. सदर निधी या विभागाच्या अधिपत्याखालील महात्मा फुले मागासवर्ग विकास महामंडळ, संत रोहिदास चर्मोद्योग व चर्मकार विकास महामंडळ तसेच महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ यांना सोबत जोडलेल्या परिशिष्ट- अ मध्ये दर्शविलेल्या विवरणपत्रातील रकाना क्र. ५ मध्ये त्यांच्यासमोर दर्शविल्यानुसार तरतूद वितरीत करण्यास खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून मंजूरी देण्यात येत आहे:-

(१) केंद्र शासनाने विशेष केंद्रीय सहाय्य योजनेबाबत मे, २०१९ अखेर एकत्रितपणे निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सुचनांनुसार खर्च करणे बंधनकारक राहील.

(२) सदर मंजूर निधीच्या किमान १० % निधी हा कौशल्य विकास प्रशिक्षणाकरिता खर्च करावा.

(३) महामंडळाकडून राबविण्यात आलेल्या विशिष्ट योजना आवश्यकता असल्यास महामंडळाच्या संचालक मंडळाकडून तपशिलवार मान्य करुन घेण्यात याव्यात.

(४) विशेष केंद्रीय सहाय्य उपयोगिता प्रमाणपत्र ( केंद्र सहाय्याच्या विहित विवरणपत्रामध्ये भरुन ) व प्रत्येक तिमाहीचा प्रगती अहवाल तिमाही कालावधी संपल्यानंतरच्या पुढील महिन्याच्या १० तारखेपूर्वी शासनास सादर करावा.

(५) अग्रणी बँका / राष्ट्रीयकृत / सहकारी बँका या वित्तीय संस्थांकडून उपलब्ध असलेल्या अर्थ सहाय्याबरोबर अनुसूचित जाती उपयोजनेंतर्गत प्रदान करण्यात आलेल्या बीज भांडवली अर्थसहाय्याची विशेष केंद्रीय सहाय्याशी सांगड घालण्यात यावी.

(६) २० कलमी कार्यक्रमांतर्गत प्रत्येक तिमाहीच्या शेवटी लाभार्थ्यांना देण्यात आलेल्या अनुदानाचा खर्च शासनास कळविण्यात यावा. त्याचप्रमाणे तिमाहीच्या शेवटी केंद्र शासनाकडे सादर करावयाच्या विहित प्रपत्रात उपयोगिता प्रमाणपत्र सादर करावे.

(७) उपयोगिता प्रमाणपत्र सादर करताना सुरुवातीची शिल्लक, मंजूर करण्यात आलेला निधी, एकूण उपलब्ध निधी यातून झालेला खर्च व तिमाहीच्या शेवटची शिल्लक याची आकडेवारी सुसंगत असल्याची दक्षता घेण्यात यावी.

२. सह सचिव (अर्थसंकल्प), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,मंत्रालय,मुंबई हे सदर अनुदानाबाबत नियंत्रक अधिकारी राहतील. वरील महामंडळाना निधी आहरण व संवितरण करण्याचे अधिकार प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण विभाग, मुंबई यांना प्रदान करण्यात येत आहे. त्यांनी अनुदानाच्या रक्कमेचा खर्च महालेखापालांच्या लेख्याशी ताळमेळ घालण्याचे काम पहावे.

यावर होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

मागणी क्र. एन-३
२२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्ग यांचे कल्याण
७९३ अनुसूचित जातीच्या घटक योजनेसाठी विशेष केंद्रीय सहाय्य
पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-
(०१) अनुसूचित जातीसाठी विशेष घटक योजना
(०१)(०१) महात्मा फुले मागासवर्ग विकास महामंडळ मर्या., मुंबई यांस
अर्थसहाय्य (कें.पु.यो. १०० टक्के) (२२२५ ०२२५) ३३ अर्थसहाय्य

(०१)(०४) संत रोहिदास चर्मोद्योग व चर्मकार विकास महामंडळ मर्या., मुंबई यांस
अर्थसहाय्य (कें.पु.यो. १०० टक्के) (२२२५ ०२५२) ३३ अर्थसहाय्य

(०१) (०२) महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ, मुंबई यांस
अर्थसहाय्य (कें.पु.यो. १०० टक्के) (२२२५ ०२३४) ३३ अर्थसहाय्य

३. हा खर्च सन २०१९-२० या चालू वित्तीय वर्षाकरिता वरील लेखाशिर्षाखाली मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा व मासिक खर्च विवरणपत्रानुसार खर्च करण्यात यावा.

४. वित्त विभागाच्या दि. ०८.०७.२०१९ च्या परिपत्रकानुसार, त्यासोबत जोडलेल्या परिशिष्टातील मुद्दा क्र. ९ नुसार परिच्छेद ७ ते १८ मध्ये अटीची पूर्तता झालेली आहे, असे प्रमाणित करण्यात येत आहे.

५. सदरहू शासन निर्णय वित्त विभागाचे अनौपचारीक संदर्भ क्र.२४/अर्थोपाय, दि.२१.०१.२०२० अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२००२१८११४७४३९१२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ASHWINI BHIMRAO YAMGAR

Digitally signed by ASHWINI BHIMRAO YAMGAR
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=f0b627b3230194fa84bd0e5b4eb590e81c2c15ce998ba19f4825b4ac3eee13ce, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=1e31be6f920a3d606925ab728a537257f35f1f0be19b929c1b0ddcba1e89366b, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=ASHWINI BHIMRAO YAMGAR
Date: 2020.02.18 11:50:54 +05'30'

**( अश्विनी यमगर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
२. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर
३. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
५. अपर कोषागार अधिकारी, कोकण भवन, नवी मुंबई
६. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
७. आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
८. प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग, कोकण विभाग, नवी मुंबई
९. वित्त विभाग (व्यय-१४/अर्थसंकल्प-७/अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई
१०. उपसचिव, केंद्रीय सामाजिक न्याय व अधिकारिता मंत्रालय, शास्त्री भवन, नवी दिल्ली
११. प्रधान सचिव आणि आयुक्त, महाराष्ट्र राज्य, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस मार्ग, नवी दिल्ली
१२. व्यवस्थापकीय संचालक, महात्मा फुले मागासवर्ग विकास महामंडळ मर्या., मुंबई
१३. व्यवस्थापकीय संचालक, संत रोहिदास चर्मोद्योग व चर्मकार विकास महामंडळ मर्या., मुंबई
१४. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ, मुंबई
१५. सह सचिव (विघयो) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१६. अवर सचिव (महामंडळे) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१७. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प) सामाजिक न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
१८. निवड नस्ती, अर्थसंकल्प ( विघयो.)

# परिशिष्ट-अ

## शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग
क्र. विकेंस-२०१९/प्र.क्र.१४/विघयो,
दि. १८ फेब्रुवारी, २०२० चे सहपत्र

## विशेष केंद्रीय सहाय्य सन २०१९-२०

(₹ .लाखात)

| अ.क्र. | महामंडळाचे नाव | संगणक संकेतांक | सन २०१९-२० मध्ये अर्थसंकल्पित तरतूद | या शासन निर्णयान्वये वितरीत केलेली तरतूद |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | महात्मा फुले मागासवर्ग विकास महामंडळ मर्या., मुंबई | २२२५ ०२२५ | ५२४०.०० | ५२४०.०० |
| २ | संत रोहिदास चर्मोद्योग व चर्मकार विकास महामंडळ मर्या., मुंबई | २२२५ ०२५२ | ३३३३.०० | १९१०.८६ |
| ३ | महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग महामंडळ, मुंबई | २२२५०२३४ | ५००.०० | ५००.०० |
| | **एकूण** | | **९०७३.००** | **७६५०.८६** |

ASHWINI BHIMRAO YAMGAR

Digitally signed by ASHWINI BHIMRAO YAMGAR
DN: CN = ASHWINI BHIMRAO YAMGAR, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = NA
Date: 2020.02.18 11:51:55 +05'30'

( अश्विनी यमगर )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन